**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई आणि विभागीय पुरवठा यंत्रणेतील गट-अ व गट-ब (राजपत्रित) अधिकाऱ्यांची वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे / अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर सेवा पुढे चालू ठेवण्याची पात्रापात्रता आजमावण्यासाठी विभागीय पुनर्विलोकन समिती गठीत करणेबाबत....**

## महाराष्ट्र शासन

**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**

**शासन आदेश क्रमांक : आस्थाप्र - २६१९/प्र.क्र. ३१९/ना.पु.१५,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०७ जानेवारी, २०२०.

**संदर्भ :** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एलपीएल-२०१७/ प्र.क्र.२१/का.पंधरा, दिनांक १० जून,२०१९.

**प्रस्तावना:**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे / अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर शासकीय अधिकारी / कर्मचारी यांचे सेवा पुनर्विलोकन करुन मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्याबाबत एकत्रित कार्यपध्दत विहित करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई आणि विभागीय पुरवठा यंत्रणेतील गट-अ व गट-ब (राजपत्रित) अधिकाऱ्यांची वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे / अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर सेवा पुढे चालू ठेवण्याची पात्रापात्रता आजमावण्यासाठी विभागीय पुनर्विलोकन समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन आदेश

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई आणि विभागीय पुरवठा यंत्रणेतील गट-अ व गट-ब (राजपत्रित) अधिकाऱ्यांचे, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम,१९८२ च्या नियम-१०(४) व नियम-६५ मधील तरतुदीनुसार वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे / अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर सेवा पुनर्विलोकन करण्याकरिता त्यांची शासन सेवा पुढे चालू ठेवण्याची पात्रापात्रता आजमावण्यासाठी पुढीलप्रमाणे विभागीय पुनर्विलोकन समिती गठीत करण्यात येत आहे:-

## विभागीय पुनर्विलोकन समिती

| अ.क्र. | अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील अधिकारी | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | सचिव / प्रधान सचिव अ /पर मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | सह सचिव / उप सचिव (ना.पु.१५ ) | सदस्य |
| ३ | मा. अध्यक्षांनी नामनिर्देशित केलेले विभागातील सह सचिव / उप सचिव | सदस्य |
| ४ | अवर सचिव, (ना.पु.१५) | सदस्य सचिव |

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००१०७१६४१२८६९०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Asmita Gopal Jagtap

Digitally signed by Asmita Gopal Jagtap
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supply And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=86c1e7844a91135f45e721934111ca2b5dc8481b51e96a79000aeea1e91208fb, serialNumber=8e2cf7f99a7e33f6152bff0b34255dd63550b37c8fbbb9a98cee4ecd4336f598, cn=Asmita Gopal Jagtap
Date: 2020.01.07 16:30:08 +05'30'

**( अस्मिता जगताप )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. प्रधान सचिव यांचे स्वीय सहाय्यक, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
२) सर्व विभागीय आयुक्त,
३) सर्व उप आयुक्त (पुरवठा).
४) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
५) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी.
६) सह सचिव (ना.पु.१५), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
७) अवर सचिव (ना.पु.१५), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
८) निवडनस्ती (ना.पु.१५).